**पोलीस दलामध्ये रजेचे रोखीकरण ६व्या वेतन आयोगाच्या वेतनाप्रमाणे करणेबाबत**

**गृह विभाग**
**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्र.एलव्हीई - ०५१०/ २४२२/ प्र.क्र. ६५८/ पोल-५ब,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : ४ मार्च, २०११.

**वाचा :-** १)एलव्हीई-२००२/प्र.क्र.५६४/पोल-५(ब), दि.२७ फेब्रुवारी २००४
२) पोलीस महासंचालक यांचे पत्र क्र. पोमसं/६/१३/ गोंदिया/ १८९/ २०१०, दि. २२.४.२०१०

**प्रस्तावना :-** पोलीस कर्मचारी/अधिकारी यांच्या कामाचे स्वरुप इतर शासकीय कर्मचारी/अधिकारी यांच्या पेक्षा वेगळे आहे. सणाच्या दिवशी इतर कर्मचाऱ्यांना सार्वजनिक सुटी असते मात्र पोलीस कर्मचाऱ्यास अशा सुटया उपभोगता येत नाहीत. उलट त्या दिवशी त्यांना दिवसभर बंदोबस्तासाठी कामावर हजर रहावे लागते.पोलीस दलात अपुरे मनुष्यबळ असल्यामुळे पोलीस कर्मचाऱ्यास १२ ते १४ तास सतत नोकरी करावी लागते. कायदा व सुव्यवस्थेच्या प्रश्नामुळे पोलीस कर्मचाऱ्याना इतर कर्मचाऱ्यांप्रमाणे नियमित रजा घेता येत नाही किंवा काही वेळा त्यांना मंजूर केलेली रजा उपभोगत असताना कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न उपस्थित झाल्यास रजा अर्ध्यावर सोडून कामावर हजर रहावे लागते. अन्य कर्मचाऱ्यांपेक्षा पोलीसांवरील कामाची जबाबदारी व कामाचे स्वरुप विचारात घेऊन पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक पदावरील कर्मचाऱ्यांसाठी १५ दिवसांच्या अर्जित रजेचे रोखीकरण करण्यास शासन निर्णय दि. २७.२.२००४ अन्वये मंजुरी देण्यात आली आहे व सदरचे रजा रोखीकरण ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती व त्यानुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** वित्त विभाग,शासन निर्णय दिनांक १५ जानेवारी २००१ अन्वये म..से.(रजा) नियम १९८१ मधील नियम-७३ ची अर्जित रजा प्रत्यार्पित करण्याची मूळ तरतूद दिनांक १.२.२००१ पासून वगळण्यात आली आहे. त्यास अपवाद करुन पोलीस दलातील शिपाई ते पोलीस निरीक्षक पदापर्यतच्या कर्मचाऱ्यांसाठी एका वित्तीय वर्षात १५ दिवसाच्या अर्जित रजेच्या प्रत्यार्पणाचे रजा रोखीकरण ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनाप्रमाणे करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. वेतन याचा अर्थ वेतन बॅड मधील वेतन + ग्रेडवेतन असा विचारात घेण्यात यावा.

सदर खर्च "२०५५-पोलीस-१०९ जिल्हा पोलीस-(००) (०१) जिल्हा पोलीस दल वेतन" व "२०५५-पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस -(०२) शहर पोलीस (०२) (०१) आस्थापना" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५/ सेवा-६, दि.३/१/११ व संदर्भ क्र. २६/ सेवा-९, दि.३/२/२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सदानंद जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधिक्षक,
महालेखापाल महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल महाराष्ट्र-२, नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
निवड नस्ती